धुळे येथे नवीन पोलीस प्रशिक्षण विद्यालय
<u>सुरु करण्यास मान्यता देणेबाबत.</u>

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय क्र.टीईएस-०२०८/प्र.क्र.४४२/पोल ५अ,
मंत्रालय, मुंबई ३२, दिनांक : १६ एप्रिल, २०१०.

वाचा : (१) गृह विभाग, शासन निर्णय क्र.रपोसे-०१/२००१/प्र.क्र.४३/पोल-१अ, दिनांक-२९.८.२००५
(२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.अेपीओ-३६०५/प्र.क्र.३(अ)/पोल-३, दिनांक-१७.२.२००६
(३) गृह विभाग, शासन निर्णय क्र.अेपीओ-३१०६/१२१४/प्र.क्र.३११/पोल-३, दिनांक १४.६.२००७
(४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/३६/र.व का.(८३००)/वि.अ.७७/२००६, दि.१७.१.२००७
(५) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.प्रशिक्षण/आस्था-१/पोप्रवि-धुळे/प्रस्ताव/०७/५४१५, दिनांक-२६.१२.२००७.

<u>शासन निर्णय</u> :-राज्य राखीव पोलीस बल गट क्र.६, धुळे हा दिनांक २८.७.२००८ पासून महिंदळे शिवार येथील नवीन जागेत स्थलांतरीत झाला. केंद्र शासनाकडून पोलीस आधुनिकीकरणाअंतर्गत Reconstruction of SRPF Campus, Dhule या कामासाठी रु.१.२० कोटी इतका निधी मंजूर करण्यात आला होता. राज्य राखीव पोलीस बल गट क्र.६ महिंदळे शिवार परिसरातील नवीन जागेत स्थलांतरीत झाल्यानंतर जुन्या ठिकाणी केंद्र शासनाकडून उपलब्ध झालेल्या रु.१.२० कोटी या निधीतून पोलीस प्रशिक्षण विद्यालयाचे बांधकाम करण्यात आले आहे. सदरील निधी अशाप्रकारे अन्य प्रयोजनार्थ वापरण्यापूर्वी शक्ती प्रदान समिती/केंद्र शासन यांची मान्यता अथवा शासनाची मान्यता घेतली नव्हती. केंद्र शासनाकडून प्राप्त सदर निधीतून ३०० प्रशिक्षणार्थींकरिता मेस हॉल, ६ वर्ग खोल्या, ३५ स्नानगृहे व २५ शौचालये याप्रमाणे बांधकाम पूर्ण करण्यात आले आहे.

२. या प्रशिक्षण केंद्राची क्षमता ३०० प्रशिक्षणार्थी इतकी आहे. पोलीस प्रशिक्षण केंद्र, धुळे साठी शासनाने खालीलप्रमाणे एकूण ११९ पदांची निर्मिती केलेली आहे-

(१)शासन निर्णय, गृह विभाग, दिनांक २९.८.२००५- प्राचार्य- १ पद,

(२)शा.नि.,गृ. वि., दि.१७.२.२००६-पो.नि.-१० पदे, पो.ह. ४० पदे, पो.शि. ६ पदे मिळून एकूण ५६ पदे.

३)शा.नि., गृ. वि., दि.१४.६.२००७-पो.नि.-१० पदे, पो.ह. ३६ पदे, पो.ना. ११, चालक पो.शि. ५ पदे मिळून एकूण ६२ पदे.

२. धुळे येथे पोलीस प्रशिक्षण केंद्र सुरु करण्यास शासनाची मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार आता राज्य राखीव पोलीस बल गट क्र.६, धुळे हे स्थलांतरीत झाल्याने रिक्त झालेल्या जागेवर पोलीस प्रशिक्षण केंद्र, धुळे हे सुरु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच या केंद्रासाठीच्या बांधकामासाठी आतापर्यंत केलेल्या खर्च रु.१.२० कोटी इतक्या खर्चास शासन कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

३. या केंद्राचे "प्राचार्य" यांना "कार्यालय प्रमुख" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच या केंद्राचे "कार्यालयीन अधिक्षक (राजपत्रित)" यांना या प्रशिक्षण केंद्राचे "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या प्रशिक्षण केंद्रासाठी सध्या उपलब्ध असलेल्या सुविधांशिवाय अन्य सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी स्वतंत्रपणे वेळोवेळी मान्यता देण्यात येईल. त्यासाठी पोलीस महासंचालक यांनी नियमानुसार योग्य तो प्रस्ताव वेळोवेळी शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१८७/१०/व्यय-७, दिनांक १३.४.२०१० नुसार त्या विभागाने दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(सदानंद जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रत,
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र, नाशिक,
सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व पोलीस आयुक्त/पोलीस अधीक्षक,
सर्व प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र,
महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे,
वित्त विभाग (कार्यासन-व्यय-७), मंत्रालय, मुंबई,
कार्यासन-बीयुडी १, पोल-४, पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवडनस्ती.